राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) योजनेअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाच्या अंमलबजावणीकरिता पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राशेअ-४६२०/प्र.क्र.१७/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२०

संदर्भ:-

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.inया सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचना.
२. शासन निर्णय क्रमांक ०३१७/प्र.क्र.१८/राकृवियो कक्ष, दि. १३ एप्रिल, २०१७
३. शासन निर्णय क्रमांक शाशेअ ४४१९/प्र.क्र.६३/८ अे, दिनांक ३१.८.२०१९
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-२१/२०१८-RFS-III, दिनांक २० जानेवारी, २०२०

प्रस्तावना

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास [Rain fed Area Development (RAD)] योजनेची अंमलबजावणी करण्यात येत असून त्याकरिता केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे. संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये सन २०१९-२० या वर्षासाठी केंद्र हिस्सा रु.२६००.०० लक्ष व राज्य हिस्सा रु.१७३३.३३ लक्ष अशा एकूण रु. ४३३३.३३ लक्ष रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. राज्य शासनाच्या श्वेतपत्रिकेमध्ये (White book) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) सन २०१९-२० करीता रु.२०००.०० लक्ष व राज्य हिस्सा रु.१३३३.०० लक्ष अशा एकूण रु. ३३३३ लक्ष रकमेची तरतूद करण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ४ येथील दिनांक २०.०१.२०२० च्या पत्रान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) योजनेअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाकरिता रु.५१२.२० लक्ष निधी राज्य शासनाकडे वितरीत करण्यासाठी त्यांच्याकडील पे अँड अकाऊंटस ऑफिसर (सेक्टर) यांना कळविले आहे. त्यानुसार राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० मध्ये सर्वसाधारण प्रवर्गाकरिता अंमलबजावणी करण्यासाठी पहिल्या हप्त्याचा केंद्र हिश्श्यापोटी रु.५१२.२० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रु. ३४१.४७ लक्ष अशा एकूण रु.८५३.६७ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

१. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० मध्ये सर्वसाधारण प्रवर्गाकरिता अंमलबजावणी करण्यासाठी पहिल्या हप्त्याचा केंद्र हिश्श्यापोटी रू. ५१२.२० लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी बारा लक्ष वीस हजार फक्त ) व राज्य हिश्श्यापोटी रू. ३४१.४७ लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी एकेचाळीस लक्ष सत्तेचाळीस हजार फक्त) असा एकूण रु. ८५३.६७ लक्ष (अक्षरी रुपये आठ कोटी त्रेपन्न लक्ष सदुसष्ठ हजार फक्त) निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे आयुक्त (कृषि) यांना पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

( रू. लाखात)

| प्रवर्ग | केन्द्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण प्रवर्ग | ५१२.२० | ३४१.४७ | ८५३.६७ |

२. राष्ट्रीय शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरीता उपलब्ध करून देण्यात आलेला केन्द्र हिस्स्याचा रू. ५१२.२० लक्ष (रुपये पाच कोटी बारा लक्ष वीस हजार फक्त )निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

**मागणी क्र.डी-३,**
२४०१-पीक संवर्धन,
१०९-विस्तार व प्रशिक्षण,
०१-माहिती व प्रसारण,
(०१)(५१)- अवर्षण प्रवण क्षेत्र कार्यक्रम (केंद्र हिस्सा)
(२४०१ ९५५४) ३३, अर्थसहाय्य.

तसेच राष्ट्रीय शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी सर्व साधारण प्रवर्गाकरीता उपलब्ध करून देण्यात आलेला राज्य हिस्स्याचा रू. ३४१.४७ लक्ष (रुपये तीन कोटी एकेचाळीस लक्ष सत्तेचाळीस हजार फक्त) निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा

**मागणी क्र.डी-३,**
२४०१-पीक संवर्धन,
१०९-विस्तार व प्रशिक्षण,
०१-माहिती व प्रसारण,(०१)(५३)- कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व नेटवर्किंग कार्यक्रम (केंपुयो) (राज्य हिस्सा ४०%), (२४०१ ए२७२)
३३- अर्थसहाय्य

३. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरीता उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिश्श्याच्या रू. ८५३.६७ लक्ष निधीचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरीता संचालक संचालक (विस्तार व प्रशिक्षण ) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हानिहाय वाटप करावयाचा निधी BDS प्रणालीद्वारे विभागीय कृषि सहसंचालकांमार्फत जिल्हयांना वितरीत करावा व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना प्राप्त निधी आहरित करुन PFMS खात्यावर जमा करावा व संपूर्ण अदायगी PFMS वरच करावी.

४. या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या रू.८५३.६७ लक्ष निधीचे सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने, निधी आहरण व संवितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संतिरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | विभागीय स्तर | संबंधित विभागीय कृषी सहसंचालक | संबंधित विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी. |
| ३ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

५. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी राज्य शासनास सन २०१९-२० करीता मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

६. सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांमधील अवर्षण प्रवण क्षेत्र घटकाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तसेच संदर्भाधीन अ.क्र. २ येथील उन्नत शेती समृद्ध शेतकरी अभियानाच्या दिनांक १३ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात यावी.

७. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

८. योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी व सहकार विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

९. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सूचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल, २०१८ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१५११४७५८७७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Bharati Dinesh Dhuri

Digitally signed by Bharati Dinesh Dhuri
DN: CN = Bharati Dinesh Dhuri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture and ADF Department
Date: 2020.02.15 11:57:17 +05'30'

**(भारती दि. धुरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे

२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
७. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल ,पुणे)
११. सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/सर्व मंडळ कृषि अधिकारी
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१४. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१६. सहायक संचालक(लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१७. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी
१८. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१९. उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२०. सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२१. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
२२. निवडनस्ती ८-अे